**विविध केंद्र/राज्य पुरस्कृत योजनांतर्गत अनुदानावर
जैविक कीटकनाशकांच्या पुरवठ्यासाठी
पुरवठा संस्थांची नियुक्ती करणेबाबत........**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सीपीएस २०१०/प्र.क्र. ५८/१७-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ९ मार्च, २०१०**

**संदर्भ :** १. शासन निर्णय क्र.पीकरक्षा १०७९/६६११४/सीआर/६२९/५अे, दि.०९/०५/१९८०
२. शासन निर्णय क्र.CPS-1280/61874/CR-99/5-A, दिनांक १०/०६/१९८३
३.. शासन निर्णय क्र.सीपीएस/१०९२/४१४१/केंनं/२१५/७ए, दिनांक १७/०७/१९९३

## पार्श्वभूमी :

विविध शासकीय योजनांतर्गत अनुदानावर रासायनिक कीटकनाशकांचा पुरवठा करण्यासाठी संदर्भिय दिनांक ०९/०५/ १९८० च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांची पुरवठा संस्था म्हणून नियुक्ती केली होती. तद्नंतर दिनांक १० जुन १९८३ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांचीही शासकीय योजनांतर्गत की टकनाशके पुरवठयासाठी पुरवठादार म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. तसेच दिनांक १७ जुलै १९९३ च्या शासन निर्णयानुसार जी कीटकनाशके महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ उत्पादन करते त्यांचा पुरवठा कृषि उद्योग विकास महामंडळामार्फत करण्याचे आदेशीत केले आहे. परंतू खरीप हंगाम २००९ मध्ये शेतक-यांना गुणवत्तापूर्ण किटकनाशकांचा वेळेवर व मागणीप्रमाणे पुरवठा होण्यास अडचणी निर्माण झाल्या होत्या. या पार्श्वभूमीचा विचार करता सन २०१०-२०११ पासून शेतक-यांना गुणवत्तापूर्ण जैविक कीटकनाशकांचा पुरवठा करण्यासाठी ज्या पुरवठा संस्थांकडे जैविक कीटकनाशके उत्पादनाची व गुणवत्ता तपासणीची सुविधा आहे अशा शासन नियुक्त पुरवठा संस्थांची नियुक्ती करणे ही बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

जैविक कीटकनाशकांच्या पुरवठ्यासाठी पुरवठा संस्थांकडे योग्य तांत्रिक मनुष्यबळ, साधन सुविधा उपलब्ध असणे गरजेचे आहे. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य बियाणे महमंडळ, अकोला या शासन अंगीकृत संस्था जैविक कीटकनाशकांचे उत्पादन करत असून त्यांचेकडे केंद्रीय कीटकनाशक मंडळाचे नोंदणी प्रमाणपत्र व किटकनाशके उत्पादन व विक्री परवाना आहे. याचा विचार करता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई व महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला यांची विविध शासकीय योजनांतर्गत अनुदानावर जैविक कीटकनाशकांच्या तालुकापातळीपर्यंत पुरवठ्यासाठी पुरवठा संस्था म्हणून शासन नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर महामंडळांकडे ज्या जैविक कीटकनाशकांची केंद्रीय कीटकनाशक मंडळांची वैध नोंदणी प्रमाणपत्रे व वैध उत्पादन / विक्री परवाने आहेत अशा जैविक कीटकनाशकांचा शासनाने निश्चित केलेल्या दराप्रमाणे पुरवठा करावा. याशिवाय शासकीय योजनांतर्गत जैविक कीटकनाशकांचा पुरवठा वेळेवर व सुरळीतपणे होण्याच्या दृष्टीने केंद्रीय कीटकनाशक मंडळांची वैध नोंदणी प्रमाणपत्रे व वैध उत्पादन / विक्री परवाना असलेल्या खाजगी क्षेत्रातील उत्पादकांकडून खुल्या निविदेद्वारे दर मागविण्याची कार्यवाही करावी व तालुकास्तरापर्यंत पुरवठयाचे दृष्टीने पुरवठासंस्था आपले दर आयुक्तालयास सादर करतील. शासकीय प्रयोगशाळा व कृषि विद्यापीठे यांचेकडे ज्या जैविक कीटकनाशकांची केंद्रीय कीटकनाशक मंडळांची वैध नोंदणी प्रमाणपत्रे व वैध उत्पादन / विक्री परवाने आहेत अशा जैविक कीटकनाशकांचा शासनाने निश्चित केलेल्या दराप्रमाणे त्यांनी थेट पुरवठा करावा.

## अ) <u>जैविक कीटकनाशकांबाबत पुरवठा संस्थांनी करावयाची कार्यवाही</u> -

१. विविध शासकीय योजनांतर्गत जैविक कीटकनाशकांच्या अनुदानावर पुरवठ्यासाठी केवळ उत्पादकांकडूनच खुल्या निविदा पध्दतीने दोन लिफाफा पध्दतीने दर मागवावेत. (लिफाफा-१- तांत्रिक बाबी, लिफाफा-२- आर्थिक बाबी)
२. शासन निर्णय व कृषि आयुक्तालयाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार गुणवत्तेसाठी उत्पादकांकडे उत्पादनस्थळी आवश्यक सर्व साधनसुविधा आणि गुणवत्ता तपासणी सुविधा असल्याची पुरवठा संस्थांनी खात्री करावी.
३. निविदा पध्दतीने तांत्रिकदृष्ट्या प्रात्र ठरणा-या उत्पादकांचा तपशिल व जैविक कीटकनाशकांच्या प्रकारनिहाय व पॅकिंगनिहाय तालुकास्तरापर्यंत पुरवठयाचे दृष्टीने दर मागवून पुरवठासंस्था प्रकारनिहाय व पॅकिंगनिहाय स्वतःचे एकच दर कृषि आयुक्तालयास सादर करतील.
४. निविदांमध्ये दर्शविलेल्या उत्पादन क्षमतेबाबत पुरवठा संस्थांनी खात्री करावी.
५. गुणवत्तापूर्ण जैविक कीटकनाशकांचा पुरवठा करण्याबाबत उत्पादकांकडून लेखी हमीपत्रे घेणे.
६. शासनाकडून दर निश्चिती झाल्यानंतर पुरवठा संस्थांनी मागणीनुसार गुणवत्तापूर्ण जैविक कीटकनाशकांचा तालुकास्तरापर्यंत वेळेवर पुरवठा करावा.
७. गुणवत्ता तपासणीत नमुने अप्रमाणित आढळल्यास, अप्रमाणित साठ्याचा पुरवठा तात्काळ थांबविणे, संबंधित उत्पादकांची अप्रमाणित आढळलेल्या बॅचच्या साठ्याची देयके अदा न करणे, आवश्यकतेनुरूप रक्कम वसुलीची कार्यवाही करणे, इत्यादी बाबत कार्यवाही पुरवठा संस्थांनी करावी.
८. त्या व्यतिरीक्त केंद्र/राज्य शासनाकडून, कृषि आयुक्तालयाकडून वेळोवेळी प्राप्त होणा-या सुचनांनुसार पुरवठा संस्थांनी कार्यवाही करावी.

## ब) <u>जैविक कीटकनाशकांबाबत आयुक्तालतीन स्तरावरुन करावयाची कार्यवाही</u> :

१. जैविक कीटकनाशके गुणवत्ता निकष, दर निश्चितीचा प्रस्ताव शासनास सादर करणे, जैविक कीटकनाशके पुरवठा, दर, गुणवत्ता नियंत्रण विषयक सविस्तर मार्गदर्शक सुचना निर्गमित करणे ही कृषि संचालक (नि. व गु. नि.) यांची जबाबदारी राहील.
२. कृषि आयुक्तालय स्तरावर जैविक कीटकनाशके मागणीबाबत आढावा घेवून पुरवठ्याबाबत समन्वय करणे ही कृषि संचालक (नि. व गु. नि.) यांची जबाबदारी राहील.
३. अप्रमाणीत नमुने आढळल्यास, सदर बॅचचा पुरवठा थांबविणे व आवश्यकतेनुरुप कायदेशीर कारवाईचे संनियंत्रण करणे ही कृषि संचालक (नि. व गु. नि.) यांची जबाबदारी राहील.
४. विविध केंद्र / राज्य पुरस्कृत योजनांतर्गत मंजूर घटकांनुसार जैविक कीटकनाशकांसाठी तांत्रीक मार्गदर्शक सुचना निर्गमित करणे, भौतीक व अर्थिक तरतुद करणे, त्यानुसार क्षेत्रीय स्तरावरुन कार्यवाही बाबत संनियंत्रण करणे ही कृषि संचालक (वि. व प्र.) यांची जबाबदारी राहील.
५. अप्रमाणीत नमुने आढळल्यास सदर बॅचचे योजनांतर्गत अर्थिक तरतुदीतुन देयके अदा न करणे, आवश्यकतेनुरुप रक्कमेची वसुली करणे याबाबींचे संनियंत्रण करणे ही कृषि संचालक (वि. व प्र.) यांची जबाबदारी राहील

## क) <u>जैविक कीटकनाशकांबाबत क्षेत्रीय स्तरावरुन करावयाची कार्यवाही</u> -

१. विविध केंद्र / राज्य पुरस्कृत योजनांतर्गत मंजूर घटकांनुसार जैविक कीटकनाशकांसाठी तांत्रीक मार्गदर्शक सुचनांनुसार योजनानिहाय जिल्ह्याची संकलीत मागणी विहीत समय मर्यादेत संबंधीत विभागीय कृषि संचालक यांचेकडे नोंदविणे ही संबंधीत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद यांची जबाबदारी राहील.
२. विभागीय कृषि सहसंचालक यांनी जिल्हानिहाय व योजनानिहाय मंजूर कार्यक्रमानुसार जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद यांची मागणी संकलीत करुन व संकलीत

तपशील आयुक्तालयास (विस्तार / निविष्ठा) कळविणे ही संबंधीत विभागीय कृषि सहसंचालक यांची जबाबदारी राहील.

३. विभागीय कृषि सहसंचालक यांच्या सदर संकलीत मागणीस कृषि आयुक्तालयस्तरावर मान्यता देणे व संबंधीत विभागीय कृषि सहसंचालक याना कळविणे ही कृषि संचालक (नि. व गु. नि.) यांची जबाबदारी राहील.
४. आयुक्तालयाचे मान्यतेनंतर संबंधीत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी यांनी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ किंवा महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ यांचेकडे पुरवठ्याबाबतचे आदेश देणे ही जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी यांची जबाबदारी राहील.
५. जैविक कीटकनाशकांच्या गुणवत्ता नियंत्रणासाठी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी यांनी नमूने काढण्याचे नियोजन करून त्याप्रमाणे कार्यवाही करणे ही जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी यांची जबाबदारी राहील.
६. पुरवठा करण्यात आलेल्या जैविक कीटकनाशकांच्या गुणवत्तेची खात्री करुन देयकांची अदायगी संबंधीत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी यांनी संबंधीत पुरवठा संस्थेस करावी. गुणवत्ता तपासणीत नमुने अप्रमाणित आढळल्यास, अप्रमाणित साठ्याचे वितरण तात्काळ थांबविणे, संबंधित उत्पादकांची अप्रमाणित आढळलेल्या बॅचच्या साठ्याची देयके अदा न करणे, आवश्यकतेनुरूप रक्कम वसुलीची कार्यवाही करणे, इत्यादी बाबत तात्काळ कार्यवाही करणे ही जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी यांची जबाबदारी राहील.
७. विभागीय कृषि सहसंचालक यांनी जैविक कीटकनाशकांच्या पुरवठ्याबाबत, गुणवत्तेबाबत व देयकांच्या अदायगीबाबत वेळोवेळी संनियंत्रण करणे व अप्रमाणित नमुन्याबाबत मार्गदर्शक सुचनांनुसार कारवाई करणे ही विभागीय कृषि सहसंचालक यांची जबाबदारी राहील.

सदर शासन निर्णय प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०१००३१०१७०३५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**(वा.म.तुरुकमाने)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ जादा प्रतीसह )
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक (विस्तार व प्रश्क्षिण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक/सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१) ( अर्थ १३ )
सर्व कार्यासने, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती